**सैनिकी सेवापुर्व शिक्षण संस्था, नाशिक येथे प्रवेश देण्यात येणा-या विद्यार्थीनींकडून सुरक्षाठेव रक्कम, कॉशन मनी,भोजन व निवास व्यवस्था रक्कम,प्रवेश शुल्क आकारणे तसेच शासनाकडून स्कॉलरशीप स्टायफंड देणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एस पी आय-२०२१/प्र. क्र.२९०/२८**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक- १६ मे, २०२३

वाचा:-

१) **सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसएसबी/२०१५/१७०/२८ दि.२६/०३/२०१५.**

२) **सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसएसबी/२०१६/२१२/२८ दि.१२/०२/२०१७.**

३) **सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.एसपीआय/२०२१/२९०/२८ दि.१०/०१/२०२३.**

४) **संचालक सैनिकी पुर्व शिक्षण संस्था,औरंगाबाद यांचे क्र.१००३/एसपीआय-१/६४२ दिनांक १२ जानेवारी २०२३ चे पत्र.**

प्रस्तावना:-

सैनिकी सेवापुर्व शिक्षण संस्था,औरंगाबादच्या धर्तीवर मुलींसाठी नाशिक येथे सैनिकी सेवापुर्व शिक्षण संस्था स्थापन करण्यास दिनांक २२ डिसेंबर २०२३ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता प्राप्त झाली आहे.उपरोक्त संदर्भ क्र.३ च्या दिनांक १०/०१/२०२३ च्या शासन निर्णयान्वये मुलींसाठी सैनिकी सेवापुर्व शिक्षण संस्थेची नाशिक येथे स्थापना करण्यात आली आहे.सदर संस्था ही औरंगाबाद येथिल मुलांच्या सैनिकी सेवा सेवापूर्व शिक्षण संस्थेची शाखा असणार आहे तर औरंगाबाद येथिल मुलांच्या सैनिकी सेवापुर्व संस्थेच्या संचालकांचे सदर संस्थेवर नियंत्रण राहणार आहे.सदरहू शासन निर्णयान्वये जुन २०२३ पासून मुलींच्या सैनिकी सेवापुर्व शिक्षण संस्थेचे शैक्षणिक सत्र चालु होणार आहे.त्या अनूषंगाने सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद यांच्या धर्तीवर विद्यार्थीनींकडून सुरक्षाठेव, कॉशन मनी,भोजन व्यावस्था इत्यादीसाठी शुल्क आकारणे तसेच शासनातर्फ़े दिल्या जाणा-या स्कॉलरशीप स्टायपेंडची रक्कम निर्धारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.तद्‌नुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णयः-**

सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद येथे प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांकडून आकारण्यात येणारे शुल्क उपरोक्त संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णायान्वये निर्धारीत करण्यात आले आहे.सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबादच्या धर्तीवर सन २०२३-२४ च्या शैक्षणिक सत्रापासून सुरू होणा-या मुलींच्या सैनिकी सेवापुर्व शिक्षण संस्था,नाशिक येथिल विद्यार्थीनींकडून खालीलप्रमाणे शुल्क आकारण्यात शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| अ.सुरक्षाठेव रक्कम | - | रू.३०००/- प्रति छात्र (एक वेळेस) खुला प्रवर्ग<br>रू.१५००/- मागास प्रवर्ग |
| ब.कॉशन मनी | - | रू. १५००/- प्रति छात्र (एक वेळेस) |
| क.भोजन व निवास व्यवस्था | - | रू. ३०००/- प्रति छात्र प्रति महिना पालकांकडून |

२. तसेच सैनिकी सेवापुर्व शिक्षण संस्था, नाशिक येथे प्रवेश घेतलेल्या विद्यार्थीनींना शासनाकडून प्रति छात्र प्रति महिना रू.२०००/-(रुपये दोन हजार फक्त) इतकी रक्कम स्कॉलरशीप स्टायपेंड देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरहू खर्च मागणी क्रमांक अ ५"२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण,६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम,२०० इतर कार्यक्रम (००) (०५) सेवा पूर्वाध्ययन संस्था. "(२२३५००७१) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०५१६१६४००६७७०७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

URMILA POPAT SAWANT

Digitally signed by URMILA POPAT SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=532e1c167ebaaff43f5811aa7e45b8f790eb47c4f4cdf5bad586d61ab9901df2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C586C9348CA72192AB033313815E031BC4374F8A3A8575A392F3FE875E8661EC, cn=URMILA POPAT SAWANT
Date: 2023.05.16 16:41:19 +05'30'

**(उर्मिला सावंत)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रतिः-**

१. मा. राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा.मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
४. मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव.
५. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा,विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
६. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद,विधानमंडळ सचिवालय,मुंबई.

७. सर्व मा.संसद सदस्य.
८. सर्व मा.विधीमंडळ सदस्य.
९. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य.
१०.सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव,सचिव.
११.विभागीय आयुक्त, नाशिक.
१२.जिल्हाधिकारी, नाशिक.
१३.संचालक सैनिक कल्याण विभाग, पुणे.
१४.संचालक सैनिकी पूर्वसेवा शिक्षण संस्था, औरंगाबाद.
१५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र माजी सैनिक महामंडळ पुणे.
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ मुंबई.
१८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई.
१९.महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर.
२०.अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र, मुंबई.